स्वीय सहायक , गट-अ (कनिष्ठ श्रेणी) संवर्गातून वरिष्ठ स्वीय सहायक, गट-अ (वरिष्ठ श्रेणी) या संवर्गात निव्वळ तात्पुरती पदोन्नती देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

**शासन आदेश क्रमांक : एमएफएस-२०२१/प्र.क्र.७२/फ-८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २२ डिसेंबर, २०२१.

**शासन आदेश :-**

सन २०२०-२१ वर्षाच्या निवडसूचीमधून वन विभागातील स्वीय सहायक, गट-अ (कनिष्ठ श्रेणी) (वेतनश्रेणी एस-१६-४४९००-१४२४००) या संवर्गातून वरिष्ठ स्वीय सहायक, गट-अ (वरिष्ठ श्रेणी) (वेतनश्रेणी एस.२३-६७७००-२०८७००) या संवर्गात पदोन्नतीसाठी निवडसूची तयार करण्याकरीता प्रधान सचिव (वने) यांच्या अध्यक्षतेखाली विभागीय पदोन्नती समितीची बैठक आयोजित करण्यात आली होती. विभागीय पदोन्नती समितीच्या शिफारशी विचारात घेऊन सामान्य प्रशासन विभागाने स्वीय सहायक, गट-अ (कनिष्ठ श्रेणी) या संवर्गातून वरिष्ठ स्वीय सहायक, गट-अ (वरिष्ठ श्रेणी) या संवर्गात तात्पुरत्या पदोन्नतीच्या निवडसुचीस मान्यता दिली आहे. त्यांनतर नागरीसेवा मंडळाच्या तसेच संक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने खालील नमूद अधिकाऱ्यांना वरिष्ठ स्वीय सहायक, गट-अ (वरिष्ठ श्रेणी) संवर्गात निव्वळ तात्पुरत्या पदोन्नतीने पदस्थापना देण्यात येत आहे:-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव व पदनाम | पदोन्नतीने पदस्थापनेचे पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|
| १ | श्री. विजय मनोहरराव मालपे, स्वीय सहायक (कनिष्ठ श्रेणी), प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) म.रा. नागपूर यांचे कार्यालय. | वरिष्ठ स्वीय सहायक (वरिष्ठ श्रेणी), प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे कार्यालय. | रिक्त पदावर |

२. वर नमूद अधिकाऱ्याला खालील अटीच्या अधिन राहून निव्वळ तात्पुरत्या स्वरुपातील पदोन्नती देण्यात येत आहे :-

**१.२** निवडसूची तयार करताना कोणीही जेष्ठ अधिकारी अनावधानाने वगळण्यात आलेले नाहीत अथवा अधिक्रमित झालेले नाहीत.

**२.२** मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अधिन राहून पदोन्नतीच्या कोट्यातीतील सर्व रिक्त पदे दि.२५.०५.२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार, निव्वळ तात्पुरत्या

स्वरुपात भरण्याबाबत सा.प्र.वि./१६ब कार्यासनाच्या दि.०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयानुसार दिलेल्या सुचनांनुसार सदर मान्यता देण्यात येत आहे. तसेच, दिनांक ७ मे, २०२१ च्या शासन निर्णयाप्रकरणी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे आव्हान देण्यात आलेले असून त्यावरील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून सदर सहमती देण्यात येत आहे.

**२.३** दिव्यांग कर्मचाऱ्यांना गट-अ व गट-ब मधील पदांवर पदोन्नतीबाबत मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल रिट याचिका स्टँप ६८१९/२०२१ व इतर याचिकांवर मा. उच्च न्यायालयाने दि.२९.०६.२०२१, दि.०८.०७.२०२१ व दि.२२.०७.२०२१ रोजी दिलेल्या आदेशाच्या अधिन राहून पदोन्नती देण्यात येत आहे.

**२.४** सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी निवडसूचीतील अधिकाऱ्यांना नियमितपणाचा कोणताही हक्क मिळणार नाही.

**२.५** निवडसूचीतील ज्या अधिकाऱ्यांच्याविरुद्ध विभागीय चौकशी सुरु असेल त्यांच्याबाबत सा.प्र.वि. शासन निर्णय दि.१५/१२/२०१७ व दि.३०.०८.२०१८ मधील तरतुदीनुसार कार्यवाही केलेली आहे.

**२.६** निवडसूचीतील अधिकाऱ्यांनी सामान्य प्रशासन विभागाच्या दि. १ ऑगस्ट, २०१९ च्या शासन निर्णयात विहित केलेल्या पदोन्नतीसाठीच्या निकषाची पूर्तता केली आहे. या अटीच्या अधिन सदर निवडसूचीस मान्यता दर्शविण्यात येत आहे.

**३.** सदर पदोन्नत अधिकारी यांना कळविण्यात येते की, त्यांनी पदोन्नतीचे आदेश प्राप्त झाल्यापासून तात्काळ नियुक्तीच्या ठिकाणी हजर होणे आवश्यक आहे. त्याप्रमाणे कार्यमुक्त केल्यानंतर विहित मुदतीत ते नियुक्तीच्या ठिकाणी हजर झाले नाहीत, तर त्यांना सदर पदोन्नतीमध्ये स्वारस्य नाही असे गृहीत धरुन शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दि.३०/४/१९९१ व दि.१२/९/२०१६ मधील तरतुदीनुसार शासनस्तवरावरुन त्यांची पदोन्नती रद्द करण्यात येईल. तसेच पदोन्नती नाकारणाऱ्या अधिकाऱ्यास आश्वासित प्रगती योजनेअंतर्गत स्वीय सहायक (गट-अ) (वरिष्ठ श्रेणी) पदाचा १२/२४ वर्षाचा लाभ दिला असल्यास तो तात्काळ थांबविण्यात यावा.

**४.** पदोन्नत झालेल्या अधिकाऱ्याने स्वीय सहायक या पदाचा कार्यभार ग्रहण केल्यानंतर वेतन निश्चितीचा विकल्प द्यावा. असा विकल्प दिल्यास, त्यांची वेतन निश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियमावली १९८१ मधील नियम क्र. ११(१) (ए) नुसार पदोन्नतीचा दिनांक विचारात घेऊन करण्यात यावी.

**५.** हे आदेश तात्काळ अमलात येतील, सदर नियुक्ती/पदस्थापना दिलेल्या अधिकाऱ्यास नियंत्रक अधिकाऱ्यांनी पदोन्नतीच्या पदावर हजर होण्यास तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच संबंधित अधिकारी यांना पदोन्नतीच्या पदावर हजर होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते पदोन्नतीच्या पदावर कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत संबंधित नियंत्रक अधिकारी यांनी आपला अहवाल शासनास ananda.shendge@nic.in या ई-मेल संकेतस्थळावर त्वरीत सादर करावा.

६. सदर शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११२२२१८०२१८९५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANANDA SHANKAR SHENDAGE

Digitally signed by ANANDA SHANKAR SHENDAGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0db7067f83b51744741b4485650edc8705560188be635df819605b4913ead056, pseudonym=F47821202A3D8C06F80E6240CB6E122AFEEDD6F5, serialNumber=DCED31BA3BA0E455430F67304905C6E3544DAE39602268D4CF2844818A1F80A4, cn=ANANDA SHANKAR SHENDAGE
Date: 2021.12.22 18:04:14 +05'30'

**( आनंदा शेंडगे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य,नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य,नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, म.रा., पुणे.
५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), नागपूर.
६. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन - दुय्यम संवर्ग), म.रा., नागपूर.
७. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (माहिती तंत्रज्ञान व धोरण) म.रा. नागपूर.
८. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संरक्षण) म.रा. नागपूर .
९. महालेखापाल (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर
१०.उप सचिव (कार्यासन-१२), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
११.जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
१२.मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
१३.संबंधित अधिकारी / प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), म.रा.नागपूर यांचे मार्फत